अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलामुलींना शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजना सन २०२३-२४ या वर्षासाठी सर्वसाधारण प्रतिक्षा सूचीतील विद्यार्थ्यांची निवड करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पशियो-२०२३/प्र.क्र.२२५/शिक्षण-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०५ जून, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि., क्र. इबीसी-२०१७/प्र.क्र.२८८/शिक्षण-१, दिनांक २७ जून, २०१७
२. शासन शुध्दीपत्रक, सा.न्या.व वि.स.वि., क्र.इबीसी-२०१७/प्र.क्र.२८८/शिक्षण-१, दिनांक १ जुलै, २०१७
३. शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि., क्र.इबीसी-२०१६/प्र.क्र.४२६/शिक्षण-१, दिनांक ३० जुन, २०१८
४. शासन निर्णय क्र.पशियो-२०२०/प्र.क्र.६५/शिक्षण-१, दिनांक २४.९.२०२०
५. शासन निर्णय क्र. पशियो २०२१/प्र.क्र.१४/ शिक्षण-१, दिनांक १० मार्च,२०२१
६. शासन निर्णय क्रमांकः पशियो-२०२३/ प्र.क्र.२२५/शिक्षण-१, दिनांक ६.०९.२०२३
७. शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि.,क्र.पशियो-२०२३/प्र.क्र.२२५/शिक्षण-१ (भाग-२), दि. १२.०१.२०२४.
८. शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि.,क्र.पशियो-२०२३/प्र.क्र.२२५/शिक्षण-१ (भाग-२), दि.१६.०४.२०२४
९. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/परदेश शिष्यवृत्ती/२०२३-२४/प्रतिक्षा यादी निवड/२०२३-२४/११४९, दिनांक २३.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी याकरीता सन २००३ पासून परदेश शिष्यवृत्ती योजना लागू केली आहे. सदर योजनेच्या नियमावलीमध्ये कालानुरुप वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या असून, वाचा क्र.१ च्या शासन निर्णयान्वये या योजनेची सुधारीत नियमावली विहीत करण्यात आलेली आहे.

महाराष्ट्रातील अनुसूचित जातीचे विद्यार्थी पदव्युत्तर पदवी आणि पीएचडी अभ्यासक्रमासाठी ३०० क्यूएस वर्ल्ड रॅन्कींगच्या आतील परदेशातील शैक्षणिक संस्थेमध्ये प्रवेश घेतील, अशा एकूण ७४ विद्यार्थ्यांना दिनांक ०६.०९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निवड समितीच्या शिफारशीने प्रस्तावित केल्याप्रमाणे, राजर्षी शाहू महाराज परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेली आहे. त्याचसोबत शासन निर्णय दिनांक १०.३.२०२१ मधील तरतुदीनुसार राजर्षी शाहू महाराज परदेश शिष्यवृत्ती योजनेंतर्गत मंजूर संख्ये इतक्या पात्र विद्यार्थ्यांची निवड करण्यात आल्यानंतर, काही विद्यार्थ्यांनी विविध कारणास्तव राज्यशासनाच्या परदेशी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत त्यांची झालेली निवड रद्द करण्याची मागणी केल्यास, अशा रिक्त होणाऱ्या जागांवर निवड समितीने शिफारस केलेल्या लगतच्या गुणवत्तेनुसार पात्र विद्यार्थ्यांच्या प्रतिक्षा यादीमधून, गुणानुक्रमे पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांची, त्याच निवड वर्षात निवड करण्याचे अधिकार राज्य शासनास असतील अशी तरतूद आहे. सदर तरतूदीच्या अनुषंगाने निवड समितीने एकूण ३८ विद्यार्थ्यांची प्रतिक्षायादी निर्धारीत केलेली आहे.

आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांनी त्यांच्या दिनांक १०.१०.२०२३ च्या पत्रान्वये शासन स्तरावरून निवड करण्यात आलेल्या एकूण ६ विद्यार्थ्यांनी विविध कारणास्तव शिष्यवृत्ती नाकारल्याने रिक्त झालेल्या त्यांच्या जागी सर्वसाधारण प्रतिक्षा सूचीतील विद्यार्थ्यांची नावे प्रस्तावीत केलेली होती. त्यानुसार शासन निर्णय दिनांक १०.३.२०२१ मधील तरतूदीनुसार त्यांच्या निवडीचा शासन निर्णय दिनांक १२ जानेवारी,२०२४ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे.

तसेच दिनांक ०१.०३.२०२४ च्या पत्रान्वये शासन निर्णय दिनांक ०६.०९.२०२३ अन्वये शासन स्तरावरून निवड करण्यात आलेल्या एकूण ७४ विद्यार्थ्यांपैकी व दिनांक १२ जानेवारी,२०२४ रोजी प्रतिक्षाधीन यादीतील निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांपैकी एकूण ६ विद्यार्थ्यांनी त्यांच्या विविध कारणांमुळे शिष्यवृत्ती नाकारली अथवा त्यांची निवड रद्द करण्यात आली आहे. अशा रिक्त झालेल्या ६ विद्यार्थ्यांच्या जागांसाठी शासन निर्णय दिनांक १०.३.२०२१ मधील तरतूदीनुसार त्यांच्या निवडीचा शासन निर्णय दिनांक १६ एप्रिल २०२४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

आता दिनांक २३.३.२०२४ च्या पत्रान्वये आयुक्त यानी दिनांक ६.९.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निवड झालेल्या १ विद्यार्थ्यांने विद्यापीठाच्या पुढील सत्रास प्रवेशास पात्र न झाल्याने शिष्यवृत्ती नाकारत असलेबाबत कळविले आहे. त्यामुळे सदरच्या रिक्त झालेल्या जागेवर प्रतिक्षाधीन यादीतील पुढील विद्यार्थ्यांची निवड करणे क्रमप्राप्त ठरत असल्याने तसा प्रस्ताव सादर केला आहे.

सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी प्रस्तावीत केल्याप्रमाणे १ विद्यार्थ्यांची निवड रद्द करून सर्वसाधारण प्रतीक्षा सूचीतील विद्यार्थ्यांचे नाव अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलामुलींना परदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी राजर्षी शाहू महाराज परदेश शिष्यवृत्ती योजना सन २०२३-२४ अंतर्गत निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे खालील नमूद तक्त्यातील एका विद्यार्थ्याची निवड रद्द करण्यात येत आहे.

**सन २०२३-२४ करीता निवड रद्द करणेबाबत कळविलेल्या विद्यार्थ्याचे नाव :**

**“तक्ता अ”**

| अ.क्र. | शासन निर्णयातील अनु. क्र. | विद्यार्थ्याचे नाव | निवड झालेली शाखा |
|---|---|---|---|
| १. | ३४ | आयुषी सुधीष रामटेके | PG (Management) |

त्यानुषंगाने परदेश शिष्यवृत्ती सन २०२३-२४ करीता उपरोक्त “**तक्ता अ**” मधील शिष्यवृत्ती नाकारलेल्या विद्यार्थ्याच्या जागेवर शासन निर्णय दि. ०६.०९.२०२३ मधील प्रतिक्षाधीन यादीतील विद्यार्थ्याची निवड करण्याकरीता पुढील “**तक्ता ब**” मध्ये विद्यार्थ्याचे नाव व शाखा प्रस्तावीत करण्यात येत आहेत.

**निवड करावयाच्या विद्यार्थ्याचे नाव**

**“तक्ता ब”**

| अ. क्र. | प्रतिक्षा यादी अनु.क्र. | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | विद्या पीठाच्या देशाचे नाव | QS World Ranking | अभ्यासक्रम | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास क्रम कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | १४ | समृध्दी रघुनाथ चव्हाण | Australian National University, Canberra | Australia | ३० | PG (Mgt) | Master Of International Management | २ वर्ष |

२. उपरोक्त **" अ "** तक्त्यात नमूद विद्यार्थ्याच्या जागी सोबतच्या **तक्ता -ब** मध्ये नमूद केलेल्या सर्वसाधारण प्रतिक्षा सुचीतील एका विद्यार्थ्याची अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मुलामुलींना परदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी राजर्षि शाहु महाराज परदेश शिष्यवृत्ती योजना सन २०२३-२४ अंतर्गत निवड करण्यात येत आहे.

३. परदेश शिष्यवृत्ती साठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांना अनुज्ञेय शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयान्वये परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांकडून शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेली हमीपत्रे घेवून तसेच विद्यार्थ्यांची मूळ कागदपत्रांची तपासणी करुनच संबंधित विद्यार्थ्यास अनुज्ञेय शिष्यवृत्ती मंजूर करण्याची कार्यवाही करावी. तसेच संबंधित विद्यार्थ्यांना शासन निर्णयात नमूद अभ्यासक्रम व कालावधीसाठी शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे तसेच विद्यार्थ्यांचे परदेशातील शिक्षण चालू असल्याच्या कालावधीत एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास, त्यानुसार देय शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे अधिकार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांना प्रदान करण्यात येत आहेत.

४. ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत परदेश शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे व त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी हमीपत्र (BOND) लिहून घेणे बंधनकारक राहील.

५. परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या विद्यार्थ्याने परदेशातील पद्व्युत्तर पदवी किंवा पीएचडी अभ्यासक्रम विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी कोणत्याही परिस्थितीत विद्यार्थ्यास मुदतवाढ वा वाढीव खर्च दिला जाणार नाही.

६. परदेश शिष्यवृत्तीसाठी निवड करण्यात आलेल्या संबंधित विद्यार्थ्यास उच्च शिक्षण घेण्यासाठी ज्या शैक्षणिक संस्था, विद्यापीठात अथवा अभ्यासक्रमास मान्यता दिलेली आहे, ते ठिकाण वा अभ्यासक्रम विद्यार्थ्याने परस्पर बदलल्यास संबंधित विद्यार्थ्याकडून शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णत: वसूल करण्यात येईल.

(अ) शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी ज्या विद्यार्थ्यांना प्रथम वर्षाची अथवा ज्यांना द्वितीय वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर झाली आहे, त्यांना त्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन, शिक्षण फी संबंधित विद्यापीठास आणि निर्वाह भत्ता व अनुषंगिक खर्चाची रक्कम संबंधित विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात अदा करावी.

(ब) त्या नंतरच्या वर्षाचे सत्रनिहाय शिक्षण शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती, उपस्थिती आणि विद्यार्थ्याचा समाधानकारक शैक्षणिक प्रगती अहवाल प्राप्त करुन त्यानुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधित वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्तीची रक्कम वरील परिच्छेद ६ (अ) नुसार अदा करावी.

७. याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्या अंतर्गत चालू आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करताना शासन निर्णय क्रमांक इबीसी-२०१७ /प्र.क्र.२८८ /शिक्षण-१, दिनांक २७ जून, २०१७, शासन शुध्दीपत्रक क्रमांक इबीसी-२०१७ /प्र.क्र.२८८ /शिक्षण-१, दिनांक १ जुलै, २०१७ व शासन निर्णय क्रमांक इबीसी-२०१६/प्र.क्र.४२६/शिक्षण-१, दिनांक ३० जुन, २०१८ व दिनांक १०.३.२०२१ मधील तसेच वेळोवेळी निर्गमित केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०६०५१४४६३५०८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.06.05 14:59:42 +05'30'

**( प्रशान्त वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, मुंबई
८. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
९. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
१३. संबंधीत विद्यार्थी (समाजकल्याण आयुक्तालय, पुणे मार्फत).
१४ उपसचिव (अर्थसंकल्प) /(विघयो), सा.न्या.व वि.स.वि., मंत्रालय, मुंबई.
१५ उपसचिव/अवर सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६ निवडनस्ती (का.शिक्षण-१)